<u>राज्य क्षेत्रातील योजना</u>

अजनुप (पुरक) पाणी पुरवठा योजना, ता.शहापूर, जि.ठाणे या योजनेच्या सुधारित अंदाजपत्रकास व <u>आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.</u>

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्र.ग्रापापु-११०८/प्र.क्र.१००/पापु-०६,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- ४ जानेवारी, २०११**

**वाचा :-** १) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्र.ववेका-१०९८/ सीआर-४३०(अ)/पापु-१०, दि.११.३.१९९८
२) अधीक्षक अभियंता, म.जी.प्रा. मंडळ, ठाणे यांचे पत्र क्र.मजीप्रामं/ताशा-२/३७९४, दि.१८.१२.२००७
३) अधीक्षक अभियंता, म.जी.प्रा. मंडळ, ठाणे यांचे पत्र क्र.मजीप्रामं/ताशा-१/३५३४, दि.६.१०.२०१०

**<u>प्रस्तावना :-</u>** सुधारित अजनुप नळ पाणी पुरवठा योजना, ता.शहापूर, जि.ठाणे या ग्रामीण नळपाणी पुरवठा योजनेच्या रु.९८.४० लक्ष इतक्या ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास वर्धित वेग कार्यक्रमांतर्गत संदर्भीय शासन निर्णय क्र.१ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तथापि, योजनेसाठी भुसंपादन व संकल्पचित्रातील बदलामुळे योजनेच्या खर्चात वाढ झाली आहे. त्यामुळे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, ठाणे यांच्याकडून संदर्भीय पत्र क्र.२ व ३ अन्वये प्राप्त झालेल्या पत्रान्वये सुधारित अजनुप (पुरक) नळपाणी पुरवठा योजना, ता.शहापूर, जि.ठाणे या योजनेला प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय :-</u>** वरील प्रस्तावनेच्या अनुषंगाने अजनुप (पुरक) नळपाणी पुरवठा योजना, ता.शहापूर, जि.ठाणे या नळपाणी पुरवठा योजनेच्या **रु.१५६.४६ लक्ष (रुपये एकशे छपन्न लक्ष सेहचाळीस हजार फक्त)** इतक्या रक्कमेच्या सुधारित अंदाजपत्रकास या शासन निर्णयान्वये मंजुरी प्रदान करण्यात येत आहे. या योजनेच्या वर्धित वेग व किमान गरजा कार्यक्रमाखालील खर्चाची विगतवारी सहपत्र-१ प्रमाणे राहील.

२. या योजनेच्या मुळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या शासन निर्णयात तसेच खाली नमुद केलेल्या ज्या सूचना दिलेल्या आहेत व ज्या अटी व शर्ती दिल्या आहेत त्याचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. सदर योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्याकडून सदर योजना प्रत्यक्षात पुर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना

ताब्यात घेण्यासंबंधी संबंधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतीच्या अधिकाऱ्यांनी संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात घेण्यापूर्वी ते कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्याकडून सुधारण्यात यावेत.

४. सदर योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) याचा दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी किंवा घसारा किंवा यंत्रसामुग्री नवी करणे, निधीसाठी किंवा योजनांच्या खर्चातील लाभ घेण्याचा हिस्सा सोसण्यासाठी येईल त्या खर्चाच्या व्यवस्थेसाठी ग्रामपंचायतीस किंवा जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी नियम,१९६० मधील तरतुदींनुसार आकारण्यात येणाऱ्या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी व सक्षम ठरेल हे पाहण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायतीची/जिल्हा परिषदेची राहील. त्या अनुषंगाने या योजनेकरीता पाणीपट्टी ग्रामपंचायत आकारेल. ग्रामपंचायतीने तशा आशयाचा ठराव केल्याशिवाय योजनेची उर्वरित कामे हाती घेवू नयेत.

५. वर नमुद केल्याप्रमाणे योजना स्वयंसंतुलित होण्यासाठी पाणीपट्टी दरात उचीत वाढ करणे व उक्त योजना **रु.१५६.४६ लक्ष** इतक्या किंमतीत पुर्ण करुन ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस हस्तांतरीत करण्याच्या अटीवर मान्यता देण्यात येत आहे.

६. या योजनेवर होणारा किमान गरजा/महाजल या लेख्याशिर्षाखालील खर्च राज्य/जिल्हा नियोजन मंडळ यांचेकडून उपलब्ध करुन घेण्यात यावा.

७. हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने तसेच नियोजन विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.३२१/१४४३, दि.६.११.२०१० व वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.५३२/१०/व्यय-३, दि.१६.११.२०१० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०१०४१५२८३५००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Sd/-

**( फु. स. मेश्राम )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१.

विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
जिल्हाधिकारी, ठाणे
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे.
मुख्य अभियंता (कोकण विभाग), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे.
वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे/नवी मुंबई
अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, ठाणे.
संचालक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पी.एम.टी.बिल्डिंग, स्वारगेट, पुणे.
उपसंचालक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, ठाणे
वरिष्ठ भुवैज्ञानिक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, ठाणे
कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, ठाणे
कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, ठाणे
ग्रंथपाल, ग्रंथालय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई (२ प्रती),
वित्त विभाग (व्यय-३), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
नियोजन विभाग (कार्यासन-१४४३), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
सर्व विधानमंडळ सदस्य
संगणक कक्ष.
मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती (कार्यासन पापु-०६)

**सहपत्र**

**शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.ग्रापापु-११०८/प्र.क्र.१००/पापु-०६,**
**दि. ४ जानेवारी,२०११ सोबतचे प्रपत्र.**

**(रक्कम रुपये लाखात)**

| **योजनेचे नांव** | **योजनेची मूळ मंजूर किंमत** | | | **योजनेची सुधारित किंमत** | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वर्धित वेग कार्यक्रमांतर्गत मंजूर तरतूद | किमान गरजा कार्यक्रमांतर्गत मंजूर तरतूद | एकूण | वर्धित वेग कार्यक्रमांतर्गत सुधारित तरतूद | किमान गरजा कार्यक्रमांतर्गत सुधारित तरतूद | एकूण |
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) |
| अजनुप (पुरक) नळ पाणी पुरवठा योजना, ता.शहापूर, जि..ठाणे. | ७४.७६ | २३.६४ | ९८.४० | ७४.७६ | ८१.७० | १५६.४६ |

**Sd/-**
**( फु. स. मेश्राम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**